निवडणूक प्राथम्य

लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२००४
निवडणूक कालावधीत शासकीय वाहनांच्या गैरवापरास प्रतिबंध करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक-सीईएल-२००४/लोकसभा/३३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १ मार्च,२००४

# प रि प त्र क

भारत निवडणूक आयोगाने, भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या तसेच त्याबाबत त्याला असलेल्या इतर शक्तींचा वापर करुन निवडणुकीच्या कालावधीत निवडणुकीच्या प्रचारार्थ, निवडणुकीच्या कार्यासाठी अथवा निवडणुकीशी संबंधित प्रवासाकरिता मंत्री, राज्यमंत्री, राजकीय पक्ष, उमेदवार वा निवडणुकीशी संबंधित अन्य कोणत्याही व्यक्तीने शासकीय वाहनांचा वापर करण्यावर पूर्णतः बंदी घातली आहे. निवडणूक जाहीर झाल्याच्या तारखेपासून ते निवडणूक पूर्ण होण्याच्या तारखेपर्यन्त मंत्री यांच्यासह अन्य कोणाही प्राधिका-यांच्या ताब्यात असलेल्या शासकीय वाहनांचा वापर निवडणूक प्रचारार्थ वा निवडणुकीशी संबंधित दौ-यावर करण्याकरिता जरी भरणा तत्वावर (on Payment Basis) करावयाचा झाला तरी, पूर्णतः बंदी घालण्यात आली आहे. याबाबत भारत निवडणूक आयोगाने दिलेल्या त्यांच्या क्र.४३७/६/९६/पीएलएन-तीन/२४११, दिनांक १५ जानेवारी,१९९६ व क्र.४३७/६/९६/(पीआर-तीन)/२२९७,दि.१६ जानेवारी,१९९६ च्या आदेशांच्या प्रती माहितीसाठी सोबत जोडल्या आहेत.

२. निवडणूक आयोगाचे वरील आदेश हे स्थायी आदेश समजण्यात यावेत व राज्यामध्ये होणा-या सर्व सार्वत्रिक / पोट निवडणुकीच्या वेळी त्यांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

३. मंत्रालयीन विभागांनी निवडणूक आयोगाच्या सूचना त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, मंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था, महानगरपालिका, नगरपालिका, सहकारी संस्था अथवा ज्यामध्ये सार्वजनिक निधी गुंतविण्यात आला आहे अशा कोणत्याही संस्था यांच्या त्वरित निदर्शनास आणून द्याव्यात व त्यांना आयोगाच्या आदेशांचे काटेकोरपणे अनुपालन करण्याच्या सूचना द्याव्यात.

GR-200404161636300002-0100

(कृ.मा.प.)

४.    सर्व प्रकारच्या शासकीय वाहनांचा गैरवापर टाळण्याकरिता, अशी वाहने ताब्यात असलेल्या अधिका-यांना व्यक्तीशः जबाबदार धरले जाईल व निवडणूक आयोगाच्या आदेशांचे उल्लंघन झाल्याचे आढळून आल्यास, अशा अधिका-यंविरुध्द कडक कारवाई करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ. न. निंबाळकर

**( अजित निंबाळकर )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय ( अपील शाखा ), मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व महानगरपालिका आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व नगरपालिका / नगर परिषदांचे मुख्य अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभागांखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,

* पत्राने.

----------

क्रमांक ४३७/६/९६(पीएलएन-तीन)/२४११, दिनांक १५ जानेवारी १९९६.

## आदेश

**विषय.**---सार्वत्रिक निवडणुका/पोट-निवडणुका---निवडणुकीच्या काळात " शासकीय वाहनांच्या " गैरवापरास प्रतिबंध करणे.

निवडणूक प्रक्रियेमध्ये शुचिता रहावी म्हणून आणि लोकांची खरी निवड प्रतिबिंबित व्हावी यासाठी त्या दृष्टीने विविध बाबींच्या संबंधात आयोगाने सूचना व आदेश काढलेले आहेत. निवडणूक प्रक्रियेमधील वाढती गुन्हेगारी आणि झुंडशाही ह्या दोन बाबी आयोगासाठी चिंतेच्या बाबी ठरल्या आहेत आणि निवडणुका शांत वातावरणात आणि निर्भयपणे व नि:पक्षपातीपणे पार पाडण्यासाठी आयोग बऱ्याच उपाययोजना करीत आहे.

२. आयोगाने आता असे ठरविले आहे की, लोकसभा आणि राज्य विधानसभांच्या सर्व सार्वत्रिक/पोट-निवडणुकांसाठी खालीलप्रमाणे स्थायी अनुदेश असतील. त्याचप्रमाणे हे अनुदेश संबंधित राज्यातील पदवीधर आणि शिक्षक मतदारसंघामधील सर्व द्विवार्षिक/ पोट-निवडणुकांनाही तसेच लागू होतील. हे अनुदेश या विषयांशी संबंधित आधीच्या सर्व अनुदेशांचे अधिक्रमण करून लागू असतील.

३. हे अनुदेश निवडणुकांची तारीख घोषित झाल्यापासून निवडणुका पूर्ण होईपर्यंत अंमलात असतील.

४. या अनुदेशांच्या प्रयोजनार्थ " वाहन " याचा अर्थ वाहतुकीच्या प्रयोजनार्थ वापरले जाणारे किंवा वापरता येऊ शकणारे कोणतेही वाहन असा आहे, मग ते वाहन यंत्रशक्तीच्या सहाय्याने गतिमान होणारे असो वा अन्यथा गतिमान होणारे असो आणि त्यामध्ये ट्रक, लॉऱ्या, टेम्पो, जीपगाड्या, मोटारगाड्या, ऑटोरिक्षा, बसेस (१) केंद्र शासन, (२) राज्य शासन, (३) केंद्र व राज्य शासनाचे सार्वजनिक उपक्रम, (४) केंद्र व राज्य शासनाचे संयुक्त क्षेत्र उपक्रम, (५) स्थानिक संस्था, (६) महानगरपालिका, (७) नगरपालिका, (८) पणन मंडळे (कोणत्याही नावाने ज्ञात असलेली), (९) सहकारी संस्था, (१०) स्वायत्त जिल्हा परिषदा किंवा ज्या संस्थांमध्ये जनतेच्या पैशाची गुंतवणूक आहे, अशी अन्य कोणतीही संस्था मग गुंतवणूक एकूण ती गुंतवणुकीचा कितीही छोटा हिस्सा असो, यांच्या मालकीची आणि संरक्षण मंत्रालय आणि गृह मंत्रालय, राज्य शासने यांच्या अधिपत्याखालील मध्यवर्ती/केंद्रीय पोलीस संघटना यांच्या मालकीची अन्य कोणतीही वाहने यांचा समावेश आहे.

५. आयोग असा निदेश देत आहे की, निवडणुकांच्या काळात प्रचार मोहीम, निवडणूक कार्य किंवा निवडणुकीशी संबंधित प्रवास करण्यासाठी शासकीय वाहनांच्या वापरावर पूर्णपणे बंदी घालण्यात येईल. (एक) केंद्र शासन, (दोन) राज्य शासन (तीन) केंद्र व राज्य शासनाचे सार्वजनिक उपक्रम, (चार) केंद्र व राज्य शासनाचे संयुक्त क्षेत्र उपक्रम, (पाच) स्थानिक संस्था, (सहा) पणन मंडळे, (सात) सहकारी संस्था, (आठ) स्वायत्त जिल्हा परिषदा किंवा ज्या संस्थांमध्ये जनतेच्या पैशाची गुंतवणूक आहे अशी अन्य कोणतीही संस्था, मग कोणताही राजकीय पक्ष, उमेदवार किंवा निवडणुकीशी संबंधित कोणतीही अन्य व्यक्ती यांनी निवडणुकीशी संबंधित कोणत्याही प्रयोजनार्थ ती गुंतवणूक एकूण गुंतवणुकीच्या कितीही छोटा हिस्सा गुंतवलेला असो यांच्या मालकीच्या (या विषयासंबंधात आयोगाच्या आदेशानुसार विनियमित असतील त्या व्यतीरिक्त) हेलिकॉप्टर, विमाने, मोटारगाड्या, जीप, स्वयंचलित मोटारगाड्या, बोटी, हॉवरक्राफ्ट इत्यादींसारख्या कोणत्याही वाहनांच्या वापरावर संपूर्ण निर्बंध घालण्यात येतील.

६. या ठिकाणी हे स्पष्ट करण्यात येत आहे की, वाहनांच्या वापरावरील बंदी, ही निवडणुका नसणाऱ्या राज्यातील किंवा त्या राज्यमधून येणारी जी वाहने निवडणुका असणाऱ्या इतर कोणत्याही राज्यात उघडपणे किंवा चोरट्या मार्गाने निवडणुकीचा प्रचार करण्यासाठी वापरण्याचा प्रयत्न केला जाईल, अशा वाहनांच्या बाबतीतही तशीच लागू होईल. प्रत्येक राज्याचा/संघराज्य क्षेत्राचा मुख्य सचिव हा, त्याच्या राज्यात होणारा कोणत्याही वाहनांच्या गैरवापरास प्रतिबंध करण्याबाबत व्यक्तिश: जबाबदार असेल आणि केंद्र शासनाच्या संबंधित विभागातील सचिव हा मंत्रालयाच्या/ विभागाच्या अखत्यारीतील कोणत्याही वाहनाच्या तसेच त्या मंत्रालयाच्या/ विभागाच्या नियंत्रणाखालील कोणत्याही सार्वजनिक क्षेत्राच्या किंवा संयुक्त क्षेत्रीय उपक्रमाच्या किंवा स्वायत्त संस्थांच्या किंवा संलग्न कार्यालयांच्या मालकीच्या वाहनांच्या गैरवापराबाबत व्यक्तिश: जबाबदार असेल. ज्या अधिकाऱ्याच्या प्रभाराखाली अशी वाहने सोपवलेली असतील ते अधिकारीसुद्धा या नियमाच्या भंगाबद्दल तेवढेच जबाबदार असतील.

७. या प्राधिकरणापैकी कोणाच्याही मालकीच्या अशा वाहनाचा कोणीही, अगदी केंद्र व राज्य शासनाच्या मंत्र्यांनीसुद्धा निवडणूक प्रचारासाठी किंवा निवडणुकीशी संबंधित दौऱ्यांसाठी, मंत्री या नात्याने निवडणूकविषयक कामाच्या खोट्या सबबीखाली पैसे भरून वापर करण्यासही पूर्णपणे मनाई आहे. या मनाईतून फक्त पंतप्रधानांचा आणि ज्याच्या जीवाला अतिरेक्यांच्या व दहशतवाद्यांच्या कारवायांमुळे धोका आहे व ज्यांना कडेकोट सुरक्षा व्यवस्थेची गरज आहे आणि संसदेने किंवा राज्य विधान मंडळाने या संदर्भात केलेल्या सांविधिक तरतुदींमध्ये ज्यांच्या सुरक्षा व्यवस्थेची तरतूद करण्यात आलेली आहे अशा इतर राजकीय व्यक्तींचा, अपवाद करण्यात आला आहे. वरील निर्बंध हे, भारताचे राष्ट्रपती व उपराष्ट्रपती, लोकसभेचे अध्यक्ष व उपाध्यक्ष आणि राज्यसभेचे उपसभापती तसेच इतर राज्यांतून राज्याला भेटी देणाऱ्या अन्य मान्यवर व्यक्ती यांच्या बाबतीतही लागू होणार नाहीत. लोकसभेचे अध्यक्ष व उपाध्यक्ष आणि राज्यसभेचे उपसभापती यांच्या बाबतीत हे निर्बंध लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या वेळी लागू होतील तथापि, केंद्र सरकारच्या किंवा कोणत्याही राज्य शासनाच्या किंवा कोणत्याही मंत्र्यांच्या बाबतीत असा अपवाद केला जाणार नाही, हे येथे स्पष्ट करण्यात येत आहे.

७-(अ). आयोगाला एक गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते की, विशेष संरक्षण गट अधिनियम, १९८८ किंवा शासनाची अन्य कोणतीही विशेष अधिनियमिती/सूचना याखालील प्राधिकरणाने ठरविलेली सुरक्षाविषयक आवश्यकता उघडउघडपणे किंवा अवाजवी रीत्या जादा आहे आणि विशिष्ट पक्षाचे किंवा उमेदवाराचे निवडणूकविषयक हितसंबंध अप्रत्यक्षपणे जपण्याचा त्यामागे हेतू आहे, अशी शंका घेण्यास आयोगास सबळ पुरावा असेल तर, आयोग, ती बाब त्वरित व उचित कार्यवाहीकरिता संबंधित शासनाच्या निदर्शनास आणून देईल.

७-(ब). या प्रयोजनार्थ, आयोग केंद्र शासनाकडून किंवा संबंधित राज्य शासनाकडून अशा कोणत्याही व्यक्तीच्या सुरक्षाविषयक आवश्यकतांबाबतची कोणतीही माहिती मागवील. अशी माहिती संबंधित शासन ताबडतोब आयोगाकडे सादर करील.

८. आयोग आणखी असाही निदेश देत आहे की, कोणत्याही परिस्थितीत, सुरक्षेसाठी असलेल्या मोटारगाड्या/वाहने यांच्या ताफ्यांत तीनपेक्षा अधिक वाहने नसावीत. सर्व मोठ्या ताफ्यांचे ते केंद्रीय किंवा राज्य शासनाच्या मंत्र्यांसोबत असले तरीही छोटे छोटे तुकडे करण्यात यावेत. तथापि, असे करताना, अशा एखाद्या व्यक्तीसंबंधात सुरक्षाविषयक काही सूचना दिल्या असल्यास त्या विचारात घेण्यात याव्यात.

९. आयोग आणखी असा निदेश देत आहे की, निवडणुकीची तारीख जाहीर झाल्यापासून ते निवडणुका पूर्ण होईपर्यंत, वर नमूद केलेल्या वाहनांचा, एखाद्या उमेदवाराकरिता किंवा उमेदवाराकडून निवडणूकविषयक कामासाठी गैरवापर होतो किंवा कसे यावर जिल्हा प्रशासनाने बारकाईने लक्ष ठेवावे. केंद्र शासनाच्या किंवा राज्य शासनाच्या वर नमूद केलेल्या एखाद्या वाहनाचा तसेच, सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांच्या किंवा स्थानिक संस्थांच्या वाहनाचा, निवडणूकविषयक कामासाठी गैरवापर होत असल्याचे आढळून आल्यास, जिल्हा दंडाधिकाऱ्याने ताबडतोब असे वाहन, योग्य ती कार्यवाही करून अधिकाऱ्यांना लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ चे कलम १६० याखालील निवडणूकविषयक आपली कर्तव्ये पार पाडण्याकरिता त्याचा वापर करता यावा म्हणून अधिग्रहित करावे किंवा तशी व्यवस्था करावी, अशा रीतीने अधिग्रहित केलेली वाहने, निवडणुकीची संपूर्ण प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत सोडण्यात येऊ नयेत.

१०. आयोगाचे वरील निदेश हे, संविधानाच्या अनुच्छेद ३२४ द्वारे आयोगाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा आणि यासंबंधात त्यास समर्थन करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून देण्यात आले आहेत.

११. हे निदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणून देण्यात यावेत. या आदेशाची इंग्रजी/हिंदी प्रत आणि कोणत्याही स्थानिक भाषेतील/भाषांतील प्रत, सर्व मान्यताप्राप्त राष्ट्रीय व राज्य पातळीवरील राजकीय पक्षांना आणि प्रत्येक उमेदवाराला किंवा त्याने प्राधिकृत केलेल्या अभिकर्त्याला, त्या उमेदवाराच्या नामनिर्देशनाच्या वेळी (पुनर्नामनिर्देशनाच्या वेळी, परंतु नामनिर्देशनाच्या छाननीच्या वेळी नव्हे) पोच घेऊन उपलब्ध करून देण्यात यावी.

## भारत निवडणूक आयोग

निर्वाचन सदन,
अशोका मार्ग,
नवी दिल्ली ११० ००१.

क्रमांक ४३७/६/९६/(पीआर-तीन)/२२९७, दिनांक १६ जानेवारी १९९६.

### आदेश

**विषय.**---सार्वत्रिक निवडणुका/पोट-निवडणुका--वाहनांच्या गैरवापरावर निर्बंध.

निवडणुकांच्या कालावधीत वाहनांच्या गैरवापरासंबंधात अनुसरावयाच्या व पाळावयाच्या निर्बंधांबाबत आयोग वेळोवेळी अनुदेश निर्गमित करत आहे. आयोगाने आता असा निदेश दिला आहे की, या आधीच्या सर्व अनुदेशांचे अधिक्रमण करून खालील अनुदेश हे लोकसभेच्या व राज्य विधानसभांच्या सार्वत्रिक/पोट-निवडणुकांसाठी स्थायी अनुदेश राहतील. संविधानाच्या अनुच्छेद ३२४ अन्वये हे अनुदेश निर्गमित करण्यात आले असून याबाबतचे इतर सर्व अधिकार आयोगास राहतील.

२. लोकप्रतिनिधी अधिनियम, १९५१ च्या कलम १२३ (५) मध्ये अशी तरतूद आहे की, उमेदवार किंवा त्याचा प्रतिनिधी किंवा उमेदवारांच्या संमतीने इतर कोणत्याही दुसऱ्याही व्यक्तीने किंवा त्याच्या निवडणूक प्रतिनिधीने मतदारांना मतदान केंद्रांकडे घेऊन जाण्यासाठी व तेथून परतीकरिता मोफत वाहनांची सोय करण्यासाठी वाहन भाड्याने घेणे किंवा मिळविणे किंवा वाहनांचा वापर करणे हे अधिनियमाच्या प्रयोजनार्थ "भ्रष्टाचाराचे कृत्य" मानले जाईल. अशा "भ्रष्टाचाराच्या कृत्याबद्दल" लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ च्या कलम १३३ अन्वये रुपये ५०० पर्यंत वाढवता येईल एवढी शिक्षा होऊ शकेल.

३. लोकसभेच्या निवडणुकांसाठी प्रत्येक निवडणूक लढवणारा उमेदवार हा मतदानाच्या दिवशी पुढीलप्रमाणे वाहनांचा उपयोग करण्यास हक्कदार राहील :---

(अ) संपूर्ण मतदारसंघात आपल्या स्वतःच्या उपयोगासाठी एक वाहन.

(ब) याशिवाय लोकसभा मतदारसंघातील प्रत्येक विधानसभा मतदारसंघाच्या भागाकरिता यथास्थिती त्याचा निवडणूक प्रतिनिधी किंवा कार्यकर्ते किंवा पक्ष कार्यकर्ते यांच्या उपयोगासाठी एक वाहन.

४. राज्य विधानसभेच्या निवडणुकांसाठी मतदानाच्या दिवशी त्या मतदारसंघातील निवडणूक लढवणारा प्रत्येक उमेदवार हा खालीलप्रमाणे वाहनांचा उपयोग करण्यास हक्कदार आहे :---

(अ) त्याच्या स्वतःच्या वापरासाठी एक वाहन.

(ब) वर दर्शविण्यात आलेल्या वाहनांप्रमाणे यथास्थिती त्याचे निवडणूक प्रतिनिधी किंवा कार्यकर्ते किंवा त्याचे पक्ष कार्यकर्ते यांच्या उपयोगासाठी एक वाहन.

५. वर उल्लेख करण्यात आलेल्या वाहनांसाठी जिल्हा दंडाधिकारी-निवडणूक निर्णय अधिकाऱ्याकडून परवाने देण्यात येतील. म्हणून उमेदवारांनी संबंधित प्राधिकाऱ्यांकडे आपल्या वाहनांची नोंदणी करावी आणि त्या प्राधिकाऱ्यांनी दिलेले परवाने आपल्या वाहनाच्या समोरच्या काचेवर (wind-screen) लावणे आवश्यक आहे. मंत्री, कार्यकर्ते, प्रतिनिधी आणि पाठीराखे यांच्यासह कोणत्याही राजकीय पक्षाच्या पुढाऱ्यास याव्यतिरिक्त इतर कोणतीही वाहने वापरण्याची परवानगी असणार नाही. उमेदवार कितीही मोठ्या दर्जाचा असला तरी कोणताही अपवाद करण्यात येऊ नये.

६. यांत्रिक शक्तीने चालवण्यात येणाऱ्या किंवा अन्यथा चालवण्यात येणाऱ्या सर्व वाहनांवर पूर्वोल्लेखित निर्बंध लागू असतील परंतु ते निर्बंध टॅक्सी, खाजगी गाड्या, ट्रक्स, ट्रेलरसहित असलेले किंवा ट्रेलरविना असलेले ट्रॅक्टर्स, ऑटो रिक्षा, स्कूटर्स, मिनी बसेस, स्टेशन वॅगन इत्यादींवर मात्र उपरोक्त निर्बंध लागू असणार नाहीत.

७. उपरोक्त निदेशांचे उल्लंघन करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीविरुद्ध लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५१ व भारतीय दंडसंहिता अधिनियम प्रकरण अकरा-अ या दोन्ही अधिनियमांच्या तरतुदींनुसार मोटार वाहन अधिनियमातील तरतुदींच्या कारवाईव्यतिरिक्त दंडात्मक कारवाई करण्यात येईल. या निदेशांचे उल्लंघन करून जी वाहने चालवण्यात येतील ती सर्व वाहने जप्त करण्यात येतील.

८. मतदानाच्या दिवशी सर्व प्रकारच्या वाहनांच्या रहदारीवर बंदी घालून जनतेला अडचणीत आणण्याचा किंवा जनतेला त्रास देण्याचा निवडणूक आयोगाचा कोणताही हेतू नाही. निवडणुकीच्या कामाखेरीज अन्य आवश्यक असलेल्या खऱ्याखुऱ्या प्रयोजनांसाठी मतदानाच्या दिवशी पुढील प्रकारची वाहने वापरण्यास निवडणूक आयोगाची परवानगी असेल, याकरिता कोणताही अपवाद असणार नाही. :—

(अ) खाजगी वाहनांच्या मालकांना त्यांच्या स्वतःच्या खाजगी वापरासाठी वापरण्यात येणारी खाजगी वाहने, परंतु निवडणुकीच्या कामाशी त्यांचा कोणताही संबंध नसावा.

(ब) खाजगी वाहनांच्या मालकांना त्यांच्या स्वतःसाठी किंवा त्यांच्या स्वतःच्या कुटुंबातील व्यक्तींसाठी मतदानाचा हक्क बजावता येण्याकरिता मतदान केंद्रावर जाण्यासाठी वापरण्यात येणारी खाजगी वाहने. परंतु मतदान केंद्रापासून २०० मीटर त्रिज्येच्या आत अशी वाहने नेता येणार नाहीत.

(क) रुग्णालयातील वाहने, रुग्णवाहिका, दूधगाड्या, वॉटर टँकर्स, तातडीच्या वीज पुरवठ्याची वाहने, कामावरील पोलिसांसाठीची वाहने, निवडणुकीच्या कामावर असलेल्या अधिकाऱ्यांची वाहने यासारख्या आवश्यक सेवांसाठी वापरण्यात येणारी वाहने.

(ड) ठराविक थांब्यांवरून व ठराविक मार्गांना चालवण्यात येणाऱ्या सार्वजनिक परिवहनाच्या बसगाड्या.

(इ) विमानतळ, रेल्वे स्टेशन, आंतर-राज्यीय बस स्थानक, इस्पितळे येथे जाण्यासाठीचा जो प्रवास अनिवार्य ठरत असेल, त्यासाठी टॅक्सी, तीन चाकी स्कूटर, रिक्षा इत्यादींचा वापर.

(फ) आजारी किंवा विकलांग व्यक्ती त्यांनी स्वतःच्या उपयोगासाठी केलेला खाजगी वाहनांचा वापर.

९. याशिवाय, असे अनुभवास आले आहे की, निवडणूक कार्य कालावधीमध्ये उमेदवार, त्यांचे प्रतिनिधी व पक्षनेते आणि त्यांचे पाठीराखे मतदारसंघामधील एखाद्या उमेदवाराच्या पाठीराख्यांना येण्या-जाण्यासाठी खाजगी वाहनांचा वापर करतात आणि अनेक प्रसंगी झुंडशाही करणारे समाजकंटक मतदारसंघातील मतदारांच्या मनामध्ये दहशत निर्माण करण्यासाठी उघड-उघड फिरत असतात. यामुळे मतदार एकतर ते विशिष्ट पक्षालाच/उमेदवारालाच मतदान करतात किंवा मतदान अगदीच करत नाहीत. काही वेळा निवडणुकीच्या काळात अशांतता निर्माण करण्याच्या हेतूने बेकायदेशीर शस्त्रे व दारूगोळ्याची चोरटी ने-आण करण्यास ही वाहने वापरण्यात येतात.

१०. अशा अनिष्ट/अवैध कृत्यांना पायबंध घालण्यासाठी आयोगाद्वारे पुढील आदेश असे देत आहे की, निवडणूक लढवणारे उमेदवार व त्यांचे इतर पक्षनेते यांच्यासोबतच्या व्यक्तींकडून वापरण्यात येणाऱ्या वाहनांनी बेकायदेशीर दारूगोळा व शस्त्रास्त्रे वाहून नेणे यासारख्या गुन्हेगारी कृत्यांसह कोणत्याही संभाव्य अपकृत्यांवर जिल्हा प्रशासनाने बारीक लक्ष ठेवले पाहिजे. जर, या वाहनांपैकी एकतर पक्षाची किंवा खाजगी मालकीची वाहने, अशा कोणत्याही कृत्यांमध्ये किंवा मतदारांच्या मनात धाकदपटशा दाखविण्याच्या किंवा दहशत निर्माण करण्याच्या हेतूने समाजविघातक व्यक्तींची ने-आण करण्यासाठी वापरात असल्याचे दिसून आल्यास अशी वाहने अटकावून ठेवणे आणि निवडणूक प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत त्यांना मुक्त न करणे हे स्थानिक प्रशासनाचे कर्तव्य असेल. याशिवाय जे अशा अवैध कृत्यांमध्ये गुंतलेले आहेत असे वाहनांचे मालक, वहिवाटदार आणि उमेदवार/राजकीय पक्ष यांच्या विरुद्धदेखील कायद्यानुसार फौजदारी कारवाई करण्यात येईल.

११. निर्भय, निःपक्षपाती व शांततापूर्ण वातावरणात निवडणुका होण्याच्या दृष्टीने निवडणूक जाहीर झाल्यावर लगेचच वाहनांची तपासणी करण्यासाठी जिल्हा प्रशासनाने मोहीम सुरु केली पाहिजे आणि निवडणूक प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत ही मोहीम चालू ठेवली पाहिजे.

१२. सर्व संबंधित प्राधिकरणांनी सर्व वाहनांच्या बाबतीत या आदेशांचे काटेकोरपणे पालन केले जात असल्याची संपूर्णपणे खात्री करून घ्यावी. खऱ्याखुऱ्या कारणास्तव किंवा वैयक्तिक वापरासाठी वाहनांचा वापर करावयाचा आहे असे भासवून कोणत्याही वाहनाचा कोणत्याही प्रकारे गैरवापर होणार नाही हे सुनिश्चित करण्याची अत्यंत काळजी घेण्यात यावी.

भारत निवडणूक आयोगाच्या आदेशानुसार व नावाने,

(सी. आर. ब्रह्म)
सचिव.

प्रति

१. सर्व राज्यांचे आणि केंद्रशासित प्रदेशांचे मुख्य सचिव.

२. सर्व राज्यांचे आणि केंद्रशासित प्रदेशांचे मुख्य निवडणूक अधिकारी.

प्रमाणे वितरण